सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्पासाठी रु.१.०० कोटी निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नादेकृ ४६२४/प्र.क्र.९९/भाग -१/८-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - ०५ जुन, २०२४

**संदर्भ:-**

१) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय, क्र.हअप्र-७१६/प्र.क्र.८२/राकृवियो कक्ष, दि. १७ जानेवारी, २०१८
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियम २०२४, क्र.अर्थसं / २०२४/ प्र.क्र.३४ / अर्थ-३, दि.०१ एप्रिल, २०२४
३) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. नादेकृ ४६२४/प्र.क्र.९९/८-अे दि.०५ एप्रिल, २०२४
४) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र. नादेकृ ४६२४/प्र.क्र.९९/ भाग -१ /८-अे, दि.०६ मे, २०२४
५) वित्त विशेषज्ञ नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांचे पत्र क्र. नादेकृसंप्र /१०२३/अंदाजपत्र २४ -२५/ प्र क्र १९७/४९६, दि. २८/०५/२०२४

**प्रस्तावना:-**

हवामान बदलास अतिसंवेदनशील असलेल्या विदर्भ व मराठवाड्यातील ४२१० गावे तसेच विदर्भातील पूर्णा नदीच्या खोऱ्यातील खारपाण पट्ट्यातील ९३२ गावे अशा एकूण ५१४२ गावांमध्ये ६ वर्षे कालावधीत जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने सुमारे रू.४००० कोटी अंदाजित खर्चाचा नानाजी देशमुख कृषि संजिवनी प्रकल्प राबविण्यात येत आहे. दिनांक १७ फेब्रुवारी, २०२२ च्या शासन निर्णयान्वये नाशिक जिल्हयातील मालेगाव तालुक्यातील सर्व गावांचा समावेश या प्रकल्पामध्ये करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

संदर्भ क्र.२ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये सन २०२४ साठी महाराष्ट्र विनियोजन (लेखानुदान) अधिनियमानुसार मंत्रालयीन प्रशासकीय विभागांचे निधी वितरण निश्चित करण्यात आलेले आहे. त्यानुसार वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांनी केलेल्या मागणीनुसार संदर्भ क्र ३ व ४ येथील शासन निर्णयान्वये आतापर्यंत रुपये २.२० कोटी निधी वितरीत करण्यात आला आहे. वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प यांच्या संदर्भ क्रमांक ४ च्या पत्रान्वये सन २०२४-२५ मध्ये नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प व्यवस्थापन कक्ष आणि क्षेत्रीय स्तरावरील कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी यांच्या माहे मे देय जून, २०२४ च्या वेतन खर्चासाठी निधीची आवश्यकता असल्याचा प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून रु.१.०० कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :**

१. सन २०२४-२५ करिता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना रु. १.०० कोटी (अक्षरी रुपये एक कोटी फक्त) निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी प्रकल्पाच्या राज्य हिश्श्याच्या ०१ - वेतन या उपलेखाशीर्षाखाली वितरीत करण्यात येत असून सदर निधी प्रकल्पाच्या राज्य हिश्श्याच्या पुढील लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ मध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

मागणी क्रमांक डी-३,
२४०१ पीक संवर्धन,
(११५) लहान /सीमांत शेतकऱ्यांची आणि शेतमजुरांची योजना,
(००) (०३) हवामान अनुकूल कृषि प्रकल्प, (राज्य हिस्सा ३०%) (कार्यक्रम)
(२४०१ A६५५)
०१- वेतन

३. या शासन निर्णयाद्वारे उपलब्ध करुन देण्यात येत असलेल्या निधीचे कोषागारातून आहरण व वितरणाकरिता प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी आणि वित्त विशेषज्ञ, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. या शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीचा विहित पद्धतीने तात्काळ विनियोग करण्यात यावा तसेच प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषि संजीवनी प्रकल्प, मुंबई यांनी ०१-वेतन या उद्दिष्टशीर्षाखाली खर्च झालेल्या रकमांचे उपयोगिता प्रमाणपत्र वेळोवेळी शासनास सादर करावे.

५. प्रकल्प संचालकांनी सदर प्रकल्पांतर्गत खर्ची पडणाऱ्या निधीची जागतिक बँकेकडून सत्वर प्रतिपूर्ती मिळवावी व मिळालेल्या प्रतिपूर्तीबाबत शासनास वेळोवेळी अहवाल पाठवावा.

६. प्रकल्प संचालकांनी सदर प्रकल्पांतर्गत झालेल्या कामांचा प्रगती अहवाल शासनास वेळोवेळी सादर करावा.

७. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील शासन परिपत्रकानुसार दिलेल्या अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०६०५१४३८३६९५०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHENDRA SOPAN GHADGE

Digitally signed by MAHENDRA SOPAN GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=9847eac29efa7aa62661b16d1619a1bfaf6d99b23ec6836d8d498d0797965898, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=761BD1B7183B95814545ACE2DBF80778C68C7EE4EF46BAA6EA9B8BD1F47C2642, cn=MAHENDRA SOPAN GHADGE
Date: 2024.06.05 14:51:59 +05'30'

**( महेंद्र घाडगे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव (कृषि ), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
६. प्रकल्प संचालक, नानाजी देशमुख कृषी संजिवनी प्रकल्प, मुंबई
७. संचालक (नियोजन व प्रक्रिया), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
८. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर
९. महालेखापाल (लेखा व अ नुज्ञेयता), महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर

१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
११. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१२. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
१३. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई
१४. वित्त विभाग (कार्यासन व्यय -१/अर्थसंकल्प-३/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई
१५. कार्यासन २-अे कृषि व पदुम विभाग मंत्रालय, मुंबई
१६. मा.मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१७. निवड नस्ती.